लहान लहान देवळा भोंवती ॥
वृक्ष ही शोभती फलभारें ॥ ९ ॥
त्यांच्या फटींतून झोंपड्या दिसती॥
वाटे त्या पाहाती डोकावून ॥ १० ॥
तयांत गरीबें निर्भय निजलीं ॥
वळचणीखालीं पक्षी जैसे ॥ ११ ॥
इंग्लंडाचीं गेहें किती शोभिवंत ॥
स्थानें मूर्तिमंत स्वातंत्र्याचीं ॥ १२ ॥

## आर्या.

या सर्व गृहांमध्यें, होवो चिरकाळ वृद्धिजीवांस ॥
देशाभिमान बुद्धि हि उपजो रक्षावया स्वदेशास ॥ १३ ॥
या वृक्षवाटिका[1] ही, हिरव्या राहोत वा अशा सतत ॥
आणि तृणावृत[2] राहो, भूमि सदा ही अशीच दवटाविन ॥ १४ ॥

---

१ झाडी. २ गवतानें झांकलेली.

इथील बाळकांचें, मन हरिखो पाहुनी स्वदेशाला ॥
आणिक तसें भजो तें, सर्व सुखानंदकंद देवाला ॥१५॥

## ताडाचें झाड. १४

### आर्या.

हा तालवृक्ष हलला, नाहीं पूर्वेकडील देशांत ॥
अर्बस्थानाच्या ही हलला नाहींच सजल भागांत ॥१॥
हिंदुस्थानांतिल ही, सिंधूच्या कोणत्याहि बेटांत ॥
दक्षिणदिग्वायूनें, आला नाहीं कधींच हलण्यांत ॥२॥
याची सुंदर छाया, पडली नाहीं कधींच बा अचल ॥
एकी कडच्या खोल हि, उदकावर जाण आफ्रिकेंतील ॥३॥
पण हा देश बहिष्कृत, एथें आहे चि उगवला गाडो ॥
भो ताले याच्या बा, जातीचें नाहिं एकही झाड ॥४॥

१ आनंदजनक. २ देशाबाहेरचा.

पूर्वदिशेकडच्या या, वृक्षाचा सोट उंच वाढून ॥
गेला वरले वर्नम, झाडाच्या पीन मोहरांतून ॥५॥
याच्या शेवळलेल्या, तळच्या जमिनीवरी कसा पाहा॥
पडलासे रंग निळा, वासाच्या वायलेट् फुलांचा हा॥ ॥६॥
हा नाडवृक्ष एथें, अगदीं परकाव सा मला गमला॥
याच्या समीप सुंदर, शुभ्र जलाचा प्रवाह चालियला॥ ॥७॥
यावरि उड्लोनामक, पुष्पांचा पेर होउनी वाहे ॥
लाइम[1] वृक्षसुवासा, भुलुनी मधमाशि भोंवतिं गुंगताहे॥ ॥८॥
व्यजन[2] समान छाये, मध्यें वा त्याच नाडवृक्षाच्या ॥
चमका मारित होत्या, दंव पडलेल्या गुलाब पुष्पांच्या ॥९॥
एक्या दिनीं सणाच्या, गाण्याचा फार रंग होऊन ॥
त्याच्या नादानें निशिं[3], गेलें उपवन समग्र तें भरून॥ ॥१०॥

---

१ इंग्लंडांतील फुलझाड. २ विंझण्यासारिखी. ३ रात्री.

पुष्पित शाखांवरुनी, होते जे फार दीप टांगाविले ॥
त्यांचें तेज दवांवर, पडुनी बहुरंग त्यांनुनी दिसले॥
॥११॥
सुंदर गोर सुशोभित, नाचत होत्या स्त्रियाहि मौजेनें॥
यास्तव जिकडे तिकडे, तें स्थल गेलें भरून शोभेनें॥
॥१२॥
त्या समुदायामध्यें, बसला होता गृहस्थ एकजण॥
त्याचें मन लागेना, त्या सुंदर नाचण्याकडे हि पण॥
॥१३॥
तो धूसर[1] रंगाचा, असुनी होताच बा नवा तरुण॥
काळ्या लांबट रेशा केशांचा ताळ्क्षिरीं[2] दिसे भरणा॥१४॥
हिंदुस्थानामध्यें, त्याचा होताचि जन्म झालेला॥
आणि स्वशिरावर तो, होता बा पिच्छमुकुट[3] ल्यालेला॥
॥१५॥
त्याच्या चर्येवरुनी, तो दिसला मनिं उदास अगदींच
आणीक त्या समाजीं[4], दिसला ताडा समान परकीच॥
॥१६॥

---

१ धुरकट रंगाचा, २ त्याच्या डोकीवर. ३ पंखाचा मुकुट. ४ समुदायांत.

मग तो उठूनि तेथुनि, पिच्छें हलवित हळू पुढें चाले॥
हिरवट ओलिवनामक, झाडें पाहुनि पथीं नतो भाळें ॥१७॥
चेसूनटनामक पुष्पें, पाहुनि ही तो न होय सानंद॥
पण ताडतरु पहातां, त्याच्या हृदयीं न माय आनंद ॥१८॥
पर्णध्वनि[1]च्या द्वारें, भाषण त्यानें तयास जें केलें ॥
तें ऐकतांच त्याचें, मौन[2] व्रत तेंहि मोडुनी गेलें ॥१९॥
त्या भाषणांत त्याला, स्मृति झाली आपल्याच बेटाची॥
तैशी त्याच्या भोंतीं, प्रकाशणाऱ्या अशा समुद्राची॥ ॥२०॥
तो पर्णध्वनि त्याच्या, कर्णाला भासला स्वदेशाचा ॥
वाटेच त्यांत कांहीं, रवे[3] आहेसा समुद्रलाटांचा ॥२१॥
जेथें वनस्पती बहु, कांठानें दाट उगवल्या होत्या ॥
तेथील मातृ[4]मंदिर, आठवलें मानिं तदा गृहस्था त्या॥ ॥२२॥

---

१ पानें वाजल्यानें. २ मुक्यानें बसणें. ३ शब्द. ४ आईचें घर.

मग त्याच्या भावांच्या, शब्द वल्ह्यांचा पडेच तत्क्षणीं॥
तीरींच ऐकलेला, शंखध्वनि येइ त्याचिया श्रवणीं[5]॥
ऐसें मनांत येतां, त्याला मोठाचि हुंदका आला॥
कडकड भेटुन तेव्हां, वृक्षानें अश्रु[6] ढाळिता झाला॥२४॥

श्लोक.

जी शक्ती मरण्यास सिद्ध करिते, देशाभिमानीनरा।
जी उद्युक्त तया भ्रनीच करिते, घायास बा संगरा[7]॥
त्या शक्ती आणि हा हि जीस धरुनी नेत्रांबुनें गाळिते।
त्यांचें मूळ समान यास्तव नव्हे निंदेस हो पात्र तो॥
॥२५॥

---

५ कानांत. ६ नेत्रोदक. ७ युद्ध.

# तारुण्यदशेंतील उमेदी. १५

## ओंव्या.

ज्ञानाच्या खाणी खणीत ॥ जाऊन शिरावें विद्यादरीत ॥
हिरून घ्यावें आदिशक्तीचें वित्त ॥ ज्ञानभांडार लुटावें ॥ १ ॥
मग त्यांच्या गर्भी प्रवेशुनी ॥ रत्नें काढावीं निवडुनी ॥
राजमुकुटींच्या रत्नाहुनी ॥ ज्यांचें मोल आगळें ॥ २ ॥
धरूनि धर्मपथ अतिउत्तम ॥ सुरळीत चालवावा पुढील क्रम ॥
सदाचार पूर्णसुखाचें धाम ॥ आहे निश्चयें जाणणें ॥ ३ ॥
सद्बुद्धि धरूनि जाण ॥ प्रगट करावें चांगुलपण ॥
तेंचि आहे खरें भूषण ॥ मनुष्याचें निश्चयें ॥ ४ ॥
आपुल्या मनाचें जाण ॥ स्वर्गीच आहे मुख्य स्थान ॥
त्यालागीं दृढचि करावी सुखभुवन ॥ स्वर्गापरी ॥ ५ ॥

---

१ विद्यादेवीचें. २ सन्मार्ग. ३ घर. ४ स्थान.

## व्यायाम.१६

### आर्या.

चित्त स्वस्थ नसून, व्याधीनें ग्रस्त जाहला काय[1] ॥
जरि तरि पडतिल कामा, देवाच्या थोर देणग्या काय ॥१॥
जो जो पदार्थ खावा, व्याधि[2]ष्ठा लागतो विषेंचव तो ॥
रोगांच्या पायीं बा, सर्व सुखालाहि जीव आंचवे[3]तो ॥२॥
सर्व सुख मासीला, कारण आहे शरीर संपत्ति ॥
व्यायामें[4] निज रक्षुनि, वागों जरि तरि नयेचि आपत्ति ॥३॥
आयुष्य आपुलें जो, घालवितो व्यर्थ अ[5]कसबोड्यांत ॥
तो सत्वर रोगाच्या, पडतो जाऊन उग्र नरड्यांत ॥४॥
परि जो शरीर अपुलें, व्यायाम करुनि कमा[6]वितो खासें ॥

1 देह 2 रोग्याला. 3 मुकतो. 4 मेहनतीनें. 5 अळशी पुरुषांत. 6 बळकट करतो.

अवयव सर्वहि हलके, होऊनि मति चालते अनायासें ॥५॥

## नित्य कर्मे. १७

### आर्या.

रेतीचे कण जैसे, एका मागून एक गळतात ॥

काळाचे क्षण तैसे, एका मागून एक पळतात ॥ १ ॥

ऐशा अनुक्रमें क्षण, कांहीं जातात कांहि येतात ॥

त्या सर्वांस धराया, घालुं नको एककाळिं तूं हात ॥ २ ॥

कर्तव्यें जीं कर्मे, वाट तुझी पाहतीं[1] क्रमानें च ॥

यास्तव एकेकावर, तूं अपुली सर्वशक्ति बा वेंच[2] ॥ ३ ॥

पुढली स्वप्नें आणुनि, मनिं तूं जाऊं नकोचि बा फुगुन ॥

घे आज नित्यकर्मा, पासुनि होईल लभ्य तें शिकुन ॥ ४ ॥

---

१ खर्चकर. २ आस.

तुझिया करितां एथें, एका मागून एक येतात ॥
जे आनंद तयांला, घ्याया कर आपुले पुढें हात ॥५॥
आलेले जातिल तरि, जाऊं दे स्वस्थ तूं सुखेंचि रहा ॥
हळहळ कशास करिसी, सर्व अशाश्वत[1] असेंचि सत्य पहा ॥६॥
ऐशा परीच दुःखें, एका मागून एक येतील ॥
भीती धरूं नको कीं, हीं मजवर एकदांच पडतील ॥७॥
एकामागें दुसरें, ऐशीं दुःखें अनुक्रमें येती ॥
तुजला गांठायाला, अभ्रें[2] जैशी महीतला[3] वरती ॥८॥

## इंग्लंड देशांतील खलाशी लोक. १८

### आर्या.

इंग्लंडस्थ खलाशी, लोकांनो व्हा समोर शत्रूच्या ॥

---

१ नष्ट. २ ढग. ३ पृथ्वीवर.

थोर लढाऊ नौका[1], लोटा आतां जळांत सिंधूच्या[2] ॥१॥
तुह्मी रक्षक आहां, या अमुच्या देशिंच्या समुद्राचे ॥
शौर्यहि तुमच्या आहे, वर्णाया जोगतें निशाणाचें[3] ॥२॥
मारुनि थोर लढांया[4], हजारवर्षे स्वकीर्तिगाजविली ॥
नौका शास्त्रांत तरी, बहु अतुळी दक्षताहि दाखविली ॥३॥
यास्तव तुह्मी लढाहो, जोंवरि चालेल हा महाप्रबळ ॥
संग्राम[5] आणि मिळवा, विजयश्री[6] सर्व खचुनी सबळ ॥४॥
आत्मेहि पूर्वजांचे, तुमच्या निघतील या समुद्राच्या ॥
एकेका लाटेंतुन, याया साह्यास पुत्रपौत्रांच्या ॥५॥
कीर्तिक्षेत्र तयांचे, नौका तैशाच सिंधुबावगर्ता[7] ॥
या वार्ता[8] मनि आणुनि, आतां तुह्मीही वा तसे वर्ता ॥६॥

---

१ नावा. २ समुद्राच्या. ३ झेंडयाचें. ४ मोठा. ५ लढाई. ६ जयलक्ष्मी. ७ कबरस्थान. ८ गोष्टी.

जेथें नेल्सन् आणि, ब्लेक असे थोर वीर पडलेले ॥
तेथें व्हाल तुह्मीही, वीरश्रीनें भरून गेलेले ॥ ७ ॥
इंग्लंडाला मोठे, किल्ले आणीक कोटही नसती ॥
त्याची अद्रिव[1] ऊर्मी, वरुनि गति आणि अर्णवीं[2] वसती ॥ ८ ॥
त्यांतील ओकनामक, झाडोंपासुन विजा कडाडून[3] ॥
खालिल शत्रुदलाचा, करिती संहार त्यावरि पडून ॥ ९ ॥
हें संकटाभ्र[4] जाऊन, पुनरपि चमकेल शांतिनक्षत्र[5] ॥
तों झळकोध्वज भीतिप्रद इंग्लंडास जो असे छत्र ॥ १० ॥
त्यासमयीं गानोत्सव, तुमच्या मानार्थ सिंधुवीरांनो[6] ॥
होइल ज्या समयीं हें, संकट पावेल नाश धीरांनो ॥ ११ ॥
यास्तव मोठ्या निकरें, युद्ध करूनीच शत्रुला पळवा ॥

---

१ पर्वतासारख्या लाटा. २ समुद्रांत. ३ ओकाच्या लांकडाच्या नावेपासून. ४ संकटरूप मेघ. ५ शांतिरूप नक्षत्र. ६ समुद्रांतील शूरानों.

मग मोठ्या संतोषें, विजयश्री आपुल्याकडे वळवा ॥१२॥

## बूक.१९

### अभंग.

मी बा पाहीं किती आहें विसंगत ॥
कांहींच जमत नाहीं माझें ॥ १ ॥
मी आहें प्राचीन मी आहें नवीन ॥
असून बंधन मोकळा मी ॥ २ ॥
बहुधा बा माझा सोनेरी पोषाख ॥
फारच उणाख बहुधा तो ॥ ३ ॥
जरीं येत नाहीं वाचतां अक्षर ॥
तरीं मी साक्षर आहें जाण ॥ ४ ॥
जरी मी जातीनें आहें बा आंधळा ॥
इतरांचा डोळा उघडितो ॥ ५ ॥

जसा मजमध्यें सदां काळेपणा ॥
तसा शुभ्रपणा सदां आहे ॥ ६ ॥
आकाशामध्यें ही नाहीं कांहीं मेळ ॥
कांकीं मी पातळ आणि जाड ॥ ७ ॥
मला नाहीं मास मला नाहीं हाड ॥
आच्छादन जाड कातड्याचें ॥ ८ ॥
इंग्लंड देशींचा आणि जर्मनींचा ॥
भरतखंडींचा राहणारा मी ॥ ९ ॥
कित्येकांची फार मजवरि प्रीति ॥
आणीक अप्रीति कित्येकांची ॥ १० ॥
बहुधा मी जरी सत्वर मरतों ॥
बहु काळ वांचतों कधीं कधीं ॥ ११ ॥

१ झाकण. २ लवकर.

विरामाचीं चिन्हें जीं जीं मजमध्यें॥
तीं तीं कोणामध्यें नाहींत बा ॥१२॥
विरामाच्या ठेपी जितक्या मजमध्यें॥
तितुक्या मुरलीमध्यें नाहींतचि ॥१३॥
गंभीर असूनी मी आहे रंगील ॥
म्हणती सकळ जन ऐसें ॥ १४ ॥

---

## मित्रवियोग. २०

### अभंग.

मित्रामागें मित्र सोडितें हें जग ॥
मित्राचा वियोग कोणा नाहीं ॥ १ ॥
एथें नाहीं तेमा जीवांचा संयोग ॥
ज्याचा वियोग होत नाहीं ॥२॥
जन्मलेल्या प्राण्यामृत्यु हा निश्चित॥

सर्व अशाश्वत[1] मृत्युलोकीं ॥ ३ ॥
मेल्ल्या नसतें परलोकीं[2] जाणें ॥
जगणें मरणें सारखेंची ॥ ४ ॥
कुंठीत[3] वा गति काळाची ही जेथें ॥
मृत्यूचाही जेथें वास[4] नाहीं ॥ ५ ॥
निश्चयेचि तेथें आहे सुखस्थान ॥
नाहीं आयुर्मान[5] क्षणिक तेथें ॥ ६ ॥
अग्नीचे स्फुलिंग[6] लोपणारे जैसे ॥
नाहींतचि तैसे भोग तेथें ॥ ७ ॥
ऐसा जो काळोक आहे वा वरता ॥
वियोगाची वार्ता तेथें नाहीं ॥ ८ ॥

---

१ नाश होणारें. २ स्वर्गी. ३ खुंटलेली. ४ वसती. ५ आयुष्य. ६ ठिणग्या.

शाश्वत[1] सुखाची सर्वदा सुबत्ता ॥
सुजना करितां केली आहे ॥ ९ ॥
प्राणी बा मेलेला भावीक ज्यनाला॥
दिसतो गेलेला दिव्य लोकीं ॥१० ॥
जैसा प्रातःकाळ चढत चि जातो ॥
पर्यंतस येतो मध्यावरी ॥ ११ ॥
ताऱ्यामागें तारा जरी मावळतो ॥
जाऊनी मिळतो तेजामध्यें ॥ १२ ॥

---

इंन्चूकेप नामक खडकावरील
घांट. २१
अभंग.

हा वेंन नव्हती कांहीं हालचाल ॥

---

१ नित्य.

नव्हता खळाळ समुद्रांत ॥ १ ॥
तारवाचीं शीडें नव्हती हालत ॥
कणाही चळत नव्हता बा ॥ २ ॥
मग अर्थातचि तारूं ही कास्थिर ॥
होतें पाण्यावर पडलेलें ॥ ३ ॥
इंचूकेप नामक खडका वरती ॥
लाटाही वाहाती संतपणें ॥ ४ ॥
धोका बसण्याचा रंग ही दीसत ॥
नव्हता लाटेंत शब्द नैसा ॥ ५ ॥
वरखाल होत नव्हती बा लाट ॥
हालेना ती घांट इंचकेपी ॥ ६ ॥
आबर ब्रथक नामक गावांत ॥
धर्मात्मा महंत राहातसे ॥ ७ ॥
त्यानें ती बा घाट बांधीयेली होती ॥

खडकावरती इंचूकेपाच्या ॥ ८॥
वादळाच्या वेळीं पाणी जेव्हां फुगे॥
तेव्हां ती तरंगे त्याच्यावरी ॥ ९ ॥
हेलकाव्यांनीं ती पाण्याचा बाडगे ॥
नाद करूं लागे बहू मोठा ॥१०॥
वादळाच्या योगें जेव्हां तो खडक॥
इंचूकेप नामक जळीं बुडे ॥ ११॥
तेव्हां त्या घाटेचे शब्द ऊंच होचे ॥
जाहाजवाल्याचे कानीं जात ॥१२॥
तेणेंकरुनीं तो खडक धोक्याचा ॥
इंचकेप नांवाचा त्यांस कळे ॥१३॥
त्यामुळें ते फार आभारी बा होत ॥
आशीर्वाद देत महंताशी ॥१४॥
इंचूकेप घांटेचा ताफा पाण्यावर ॥

बरा काळसर दिसत होता ॥ १५ ॥
रोबर तारबावर चढियेला ॥
तो काळा मजला रोखीयेला ॥ १६ ॥
घांट आणि ताफा दोहोंवरी डोळा ॥
ठेवूनि बोलला रोबर तो ॥ १७ ॥
खलाशी लोकांनों होडी खाली टाका ॥
इंचकेप खडकापाशी चला ॥ १८ ॥
आरब्रोथ ऐथील मोठ्या महंतास ॥
देईन मी त्रास निश्चयेंची ॥ १९ ॥
तारू काढूनीया वल्हीं मारिता त ॥
आणी ते जातात खडकापाशी ॥ २० ॥
रोबरानें घांट खडकावरूनी ॥
ओणवा होऊनी तोडीयेली ॥ २१ ॥
तेव्हां ती गरगर शब्द करूनीया ॥

तळीं जाऊनीयां बैसली बा ॥ २२ ॥
बुडबुडे तेव्हां वर फार आले ॥
फुटूनीयां गेले चहूंकडे ॥ २३ ॥
ऐसें करूनीयां रोबर बोलला ॥
आतां महंताला आरब्रोथाच्या ॥ २४ ॥
नाहीं मिळणार दुसऱ्यापासून ॥
आशीर्वाद जाण पुढें कधीं ॥ २५ ॥
इकडे तिकडे फिरला रोबर ॥
पाण्यांतून फार दीस लोभें ॥ २६ ॥
लुटीच्या द्रव्यानें गबर होऊन ॥
जाई मार्ग धरून स्काटलंडाचा ॥ २७ ॥
धुकें आकाशांत फारची चढलें ॥[1]
तेणें दृष्टी नोलें सूर्यबिंब ॥ २८ ॥

1 नाही असलें.

सगळा दिवस वारा बा वाहीला ॥
परी तो पडला संध्याकाळीं ॥ २९ ॥
ऐकूं येत नाहीं लाटा रोरावत ॥
काय तूज आतां ऐक बोले ॥ ३० ॥
मला वाटतें बा समुद्राचें तीर ॥
नाहीं फार दूर एथूनीया ॥ ३१ ॥
आतां कोठें आहों नाहीं सांगवत ॥
असती वाजत घांट आतां ॥ ३२ ॥
तरी बरें झालें असतें आमूचें ॥
आतां काय त्याचें बोलूनीया ॥ ३३ ॥
काहीं शब्द नाहीं त्यास ऐकूं आला ॥
फुगारा चढला उदकास[1] ॥ ३४ ॥

---

१ पाण्यास.

वारा जरीं होता अगदीं पडला ॥
जलप्रवाहाला लागलें तें ॥ ३५॥
तें तारूं वाहात वाहात चाललें ॥
आणि आदळलें खडकाला ॥ ३६॥
तोचि बा खडक इंच्केप नामक ॥
करणी अलौकीक ईश्वराची॥ ३७॥
सोवरें आपुले केस उपडले ॥
आपणा निंदीलें निराशेंत ॥ ३८॥
चोहीं कडूनीही लाटा आंत आल्या॥
तळीं नेल्या झाल्या तारवास॥ ३९॥
लोकांचे वाईट जे नर इच्छीती ॥
त्यांची होते गती ऐशा परी ॥ ४०॥

## उद्योग. २२

### आर्या.

भगवत्संकेत[1] असा, दिसतो सर्वांहि मनुष्यजातीनें[2] ॥
सृष्टिक्रम रक्षाया, श्रमकेले पाहिजेत जातीनें ॥ १ ॥
अकशी व्हावें म्हणूनी, सांग मला कोण जन्मला आहे ॥
कांहीं ना कांहींतरि, उद्योगातें मनुष्य करिताहे ॥ २ ॥
लोक कितिएक पहा, कृषिकर्मातें करीत आहेत ॥
कितिएक ऐरणीवर, बसले आहेत घाव मारीत ॥ ३ ॥
कित्येक माग लावुनि, पाहा कैसे बहूत जलदीनें ॥
धोटे फिरवुनि सूत्रें, वस्त्रांसी बसविनात युक्तीनें ॥ ४ ॥
भरती होटी वारे, यांची माहिति करून घेऊन ॥
व्यापारार्थ[3] किती बा, फिरती सर्वत्र सागरांतून ॥ ५ ॥

---

१ परमेश्वराचें मनोगत. २ मनुष्य मात्रानें. ३ व्यवहार.
४ सूतां.

हातांनीं पायांनीं, करिती कित्येक फार दुःसाध्य ॥
कामें कौशल्याचीं, उद्योगातें करून जीं साध्य ॥६॥
ज्यांची बुद्धी सदसत्, विचार करण्यास योग्य बा होते ॥
भाषण विचार यांच्या, द्वारें करितात साह्य अन्यांतें ॥७॥
प्रत्येक[1] कष्टतो जरि, अपुला अपुलाचि अर्थ[2] लक्षून[3] ॥
तरि सर्व जनाचें हित, बहु होतें जाण त्याजपासून ॥८॥
जन्मूनि एकमेकां, वरि जरि उपकार लोक करतील ॥
तरि बा परस्परांचे, उपकार अनुक्रमेंचि फिटतील ॥९॥
राजाचा जो होतो, भोजन विस्तार थाट माटाचा ॥
त्या करितां तो आहे, उपकारी दीनकाम कर्त्याचा ॥१०॥
तो अपुल्या आंगावर, करितो जो राजकीय पोषाग ॥
तो त्याजला मिळाया, कारण आहे सचीत बा माग[4] ॥११॥

---

१ हरएक मनुष्य. २ लाभ. ३ पाहून. ४ वस्त्रें विणण्याचें यंत्र.

गवळ्याचे श्रम त्याला, कडक हवेपासुनीच रक्षीत ॥
नाहीन काय त्याला, लोहाराची कृतीहि शोभवित॥७२॥
हे सारे राजाचे कार्य करूनी स्वधर्म जागविती ॥
राजा ही जिनगीला, त्यांच्या रक्षूनि पाळितो नीती॥७३॥
राजाच्या सत्तेनें, सर्वाला आपुल्या प्रयासाचें ॥
फळ मोठ्या आनंदें सांपडतें भोगण्यास हें साचें॥७४॥
ऐशापरीच सर्वहि, राजापासून रंक पर्यंत ॥
उद्योगाच्या योगें, निश्चित होतात सर्व धनवंत॥७५॥

---

१ तरवार इत्यादि पदार्थ. २ श्रमानें. ३ गरीब.

## मेलेल्या मुलाच्या सुंदर पुतळ्यावरून सुचलेली गोष्ट. २२

### अभंग.

बाळा म्यां तुजला साजीरें गोजीरें॥
जीवंतपणीं रे पाहीयेलें ॥ १ ॥
स्वसंतोषें रानीं उडतां पाडस ॥
दीसतें नेत्रास रम्य जैसें ॥ २ ॥
तैसें तूं होतेस बाळक देखणें ॥
आणि गोजिरवाणें तयेंकाळीं॥ ३॥
आपूला आरसा धुंडीत होतेंस ॥
सगळा दिवस एकेवेळीं ॥ ४ ॥
जेव्हां तो आरसा दृष्टीस पडला॥
तेव्हां झाला तूला हर्ष फार ॥ ५ ॥
जेव्हां त्या हर्षाची उकळी फुटली॥

हवा नादावली भोंवालींची ॥ ६ ॥
म्यां तुज पाहिलें सुंदरा ज्यावेळीं ॥
बहीण जवळी होती तूझी ॥ ७ ॥
दिसली ती मला कमळाची जात ॥
आणि टवटवीत गुलाब तूं ॥ ८ ॥
त्या वेळीं म्यां तूझी आईही पाहीली ॥
धन्यता दिसली नेत्रीं तीच्या ॥ ९ ॥
तिचा तो आनंद पाहूनी मी भ्यालें ॥
दुःखानें भाजलें होतें म्हणुनी ॥ १० ॥
तुझ्या मातोश्रीच्या कुरळ्या केशांत ॥
ह्या होता शोभत एक हात ॥ ११ ॥
दुसऱ्या हातानें ओटीत होतासी ॥
तिच्या पदरासी मौक्तिकांच्या ॥ १२ ॥
त्याची वोढ जेव्हां बैसली निजला ॥

धमकाविलें तुला हांसतन्ची ॥१३॥
आणीक मजला उमगेना कांहीं ॥
बाळक कीं आई गोजिरवाणी॥१४॥
आतांही पाहाते तुजला गोजीरें ॥
निवांतवाणी रे झोंप घेनां ॥१५॥
पण तुझ्या नेत्रीं काय हा फरक ॥
नाहीं बा चमक काडीभर ॥१६॥
भिंवया ही तुझ्या नाहीं बा फिरत ॥
हालत नाहींत ओंठ तूझे ॥१७॥
बाळा तूझें रूप सुंदर दिसतें ॥
केश ही शिरातें शोभवीती ॥१८॥
उद्योगीं हीं तुझीं बोटें चिमुकलीं ॥
आहेत ठेवलीं ऊरीं तूझ्या ॥१९॥

---

१ डोक्यास.

पण आतां तूझें मौजेचें नाचणें ॥
आणीक पळणें संपलें बा ॥ २० ॥
बाळा तुझी यात्रा या मृत्युलोकांत॥
थोड्याच काळांत आटपली ॥ २१॥
जैसें तूं सुंदर पूर्वी दिसलेंस ॥
तैसें दिसतेस आजूनही ॥ २२ ॥
आरशांत पूर्वी प्रतिबिंबें दोन ॥
दिसलीं आतां ऊन एक दीसे ॥ २३ ॥
तुझें बाळा आतां हांसणें खेळणें॥
लाडकें बोलणें बंद झालें ॥ २४ ॥
तुझें घर आतां उदास दिसतें ॥
भरलें जें होतें आनंदानें ॥ २५ ॥

---

१ पडछाया. २ कमी.

परि पाठांतील या स्थलावरतें ॥
अचल दिसतें रूप तुझें ॥ २६ ॥
पण गाहिंवरें व्यापलें म्हणूनि ॥
नाहीं या नयनीं पाहावत ॥ २७ ॥

---

## चमत्कारिक न्याय २४

### ओंव्या.

नासिका आणि नयनें[1] ॥
यांमध्यें अति विलक्षण ॥
वाद पडला उपनेत्रानें[2] ॥
तें कोणाचें म्हणूनी ॥ १ ॥

---

१ डोळे. २ चष्मा.



तैं जिव्हामध्यस्थ होऊन ॥
उभयपक्षांचे करी प्रतिपादन ॥
विद्यामुकुट धारण करून ॥
न्यायोक्तीतें शाऊनी ॥ २ ॥
शोधून काढाया वास्तवसार ॥
जे कर्ण विख्यात धुरंधर ॥
ते बैसले करावया विचार ॥
जिव्हा प्रणीत गोष्टींचा ॥ ३ ॥
प्रथम नासिकेचा पक्ष धरून ॥
जिव्हा बोले आदरें करून ॥
तिचा भोगवटा चिरकालापासून ॥
आहे उपनेत्रीं निश्चयें ॥ ४ ॥

---

१ जीभ. २ संभाषण. ३ विद्याभूषण. ४ खरा सारांश. ५ विचारचतुर. ६ प्रतिपादन.

जिव्हा उचलूनि उपनेत्रासी ॥
दाची सर्व सभासदांशी ॥
पहा याचा मध्य नासिकेसी ॥
बैसो ऐसा केलासे ॥ ५ ॥
अश्वपृष्ठीं[१] जैसें जीन ॥
तैसें नाकीं बसावें चिकटून ॥
ऐसा घाट केल्यावरून ॥
उपनेत्र दिसतें नियेनें ॥ ६ ॥
दुसरी विनंती स्वामीस ॥
आहे पारसावी तीस ॥
कीं नासिका नसती मुखास ॥
कोण या धरितें उपनेत्रा ॥ ७ ॥

१ घोड्याच्या पाठीवर.

या स्फयुक्त कारणावरून ॥
त्यांनीस येईल स्पष्ट दिसून ॥
कीं उपनेत्र निश्चयें करून ॥
नासिकेचेंच म्हणूनी ॥ ८ ॥

मग नासिका पक्ष सोडून ॥
तत्काळ बोलणें फिरवून ॥
नेत्राकडचा पक्ष धरून ॥
जिव्हा बोलूं लागली ॥ ९ ॥

पक्ष फिरविण्याचें कामांत जाण ॥
चतुर असती न्याय निपुण ॥
परिनेत्रपक्षाचें कारण ॥
सुयुक्त नादिसे तितुकें पैं ॥ १० ॥

---

१ उघड.

तीं कारणें न्याय कर्त्यास ॥
पडलीं नाहींत पसंतीस ॥
म्हणून ह्या प्रसिद्धीस ॥
लोकीं आलीं नाहींत ॥११॥
दोह्रीं पक्षांचें भाषण ॥
न्यायाधीश घेती ऐकून ॥
निर्णय केला गांभीर्यें[1] करून ॥
किंतु न राही ऐसाची ॥१२॥
दिवसां अथवा रात्रीस ॥
जें नासिका वापरील उपनेत्रास।
तें नेत्रांनीं स्वतां आपणास॥
झांकून घ्यावें सर्वदां॥१३॥

---

१ स्थिर मनानें. २ श्वास.

## काजवा. २५

### आर्या.

फिरतो जो कृपणाच्या, खालीं अथवा समीप उदकाच्या॥
तो कीटक रात्रीचा, बहु चमका मारितो उजेडाच्या॥१॥
त्याचा प्रकाश दिवसां, उजडीं अगदींच लोपुनी जातो ॥
उत्पत्तिवाद ज्याचा, मिटला नाहींच आज पावेतों॥२॥
कितिएक मस्तकाच्या, पासुनि निघतो असेंचि म्हणतात।
कितिएक शेपटीच्या, पासुनि निघतो असेंचि वदतात॥३॥
पण हें खरें निशाज्या, हस्तानें अंबरा प्रकाशविते ॥
त्यानेंच ती तयाला, माफक देऊनि तेज शोभविते॥
॥४॥
ईश्वर सुचना करितो, ऐसें कीटास तेज देऊन ॥
पांथोला कीं तुम्हीं, चालावें फार लक्ष्य देऊच॥५॥

---

१ आकाशास. २ वाटसरूला.

नाहीं तर पायांच्या, खालीं तेजस्वि कीट तुडवेल ॥
ज्याचें तेज तुम्हांला, पडतें कामास रात्रिं बहुवेळ ॥६॥
प्रभुसंकेत कसाही, असला तरि हा खराच तत्वार्थ॥
कीं तो प्रकाश दिधला, कीटाला ईश्वरेंहि कार्यार्थ ॥७॥
मोठेपणा मिरवितो, कीटहि दावुन खदीप रत्नास॥
ही गोष्ट बोधकारक, होवो बा श्री मदांधलोकांस॥८॥

---

## परस्परानीं परस्परांवर दया करणें हा मुख्य स्वाभाविक धर्म. २६

ओंवी.

आंद्रोक्लीज जया अभिधान ॥
तेणें केला स्वामिद्रोह जाण ॥
म्हणून तयापासून मरण ॥
जाणून पळाला भीतीनें ॥१॥

---

१ खराअर्थ. २ धन्यांशीं द्वेष.

लिबियादेशीं अतिविस्तृत ॥
वालुकामय प्रदेशांत ॥
येऊन पातला तो त्वरित ॥
मोठ्या वेगें करूनी ॥ २ ॥

मार्ग चालतां चालतां व्याकुळ ॥
झाला तीव्रोष्णें अतिविव्हळ ॥
परितया दिसला शीतळ ॥
अतिविमळ आश्रम ॥ ३ ॥

तेथें जाऊन स्वशरीर ॥
विश्रांत्यर्थ पसरी धरणीवर ॥
तंव भला मोठा सिंह गव्हर ॥
आला तेथें त्याकाळीं ॥ ४ ॥

---

१ कडक उन्हानें. २ घर. ३ भुईवर. ४ भेंव.

प्रचंड[1] गर्जना करीत ॥
जवळ येऊं पाहे त्वरित[2] ॥
परि त्यांत मी रोगग्रस्त ॥
ऐसें दर्शवुनी येतसे ॥ ५ ॥
अति दीनवाणें तोंड करून ॥
आपुला पंजा उचलून दावून ॥
जो मार्गी भेटेल त्यापासून ॥
सहाय मागूं लागला ॥ ६ ॥
[illegible]कून आलेला गृहस्थ ॥
कांही वेळ झाला भयत्रस्थ ॥
म्हणून भयभीत स्वहस्त ॥
पुढें कराया धजेना ॥ ७ ॥

---

१ मोठी. २ लवकर.

मग होऊन विशेष धीट ॥
जाऊन सिंहाच्या निकट ॥
पंजा पाहे निरखून नीट ॥
तो तीक्ष्ण कंटक देखिला ॥ ८ ॥
मग तो काढिला उपटून ॥
पूयरक्त पुसून टाकून ॥
मुक्त केला दुःखापासून ॥
सिंह उभा राहीसा ॥ ९ ॥
प्रत्यही सिंह जाऊन वनास ॥
भक्ष्य शोधून आणी त्या स्थलास ॥
त्यांतील भाग त्या मित्रास ॥
देऊन स्वयें तोषवी ॥ १० ॥

1 दररोज.

मनीं तिरस्कार न करून ॥
अपक्क[1] असतांही घेऊन ॥
भूमीवरी तया ठेवून ॥
सिंहास भागी होतसे ॥ ११ ॥
ऐशा प्रकारें कालक्षेप करून ॥
आयुष्य घालविणें विदेशी राहून ।
याहून स्वदेशी स्वामी पासून ॥
मरण बरें वाटलें ॥ १२ ॥
जें गृह मनुष्याचें जन्मस्थान ॥
तेथें जावया धांवतें मन ।
जरी मरण प्राप्त होणार जाण ॥
निश्चयें असलें तरी ही ॥ १३ ॥

---

१ कंटाळा.

तो घरीं येण्या बरोबर ॥
स्वामी शिक्षा ठरवी अघोर॥
कीं त्याचें खावबावें शरीर॥
सिंहादिकां कडोनी ॥ १४ ॥
मग मोठ्या वाळवंटावर ॥
लोकें समाज जमला फार॥
आंड्रोक्लीस त्या समोर ॥
उभा केला निर्दयपणें॥१५॥
तों कर्मधर्म संयोग ॥
पाहा कैसा आला योग ॥
त्याचें भक्षावया सर्वांग ॥
तोचि सिंह सोडिला॥१६॥

---

१ मोठी. २ समुदाय.

तो सक्रोध आणि क्षुधाक्रांत॥
सांपळ्यांतून आला धांवत ॥
जाऊन पडे तो अतित्वरित ॥
आपुल्या इष्टभक्ष्यावरि॥१७॥
तया पाहातां ओळखिलें त्वरित।
कीं जेणें आपणास केलें दुःखमुक्त[1]।
तोचि हा गृहस्थ निश्चित ॥
आहे म्हणूनी त्याकाळीं॥१८॥
मग थोडी विश्रांती घेऊन[2]॥
त्याचे सर्व उपकार आठवून॥
आपलें चित्त स्वस्थ करून॥
पायीं लागे तयाच्या॥१९॥

---

१ दुःखापासून सोडिवलें. २ थांबून.

ऐसा हा अपूर्व चमत्कार पाहून ॥
आश्चर्यभरित झाला सर्वजन ॥
तेव्हां आंद्रोक्लीज पुढें होऊन ॥
बोलता झाला येणेंपरी ॥ २० ॥
अहो सर्व रो[1][illegible]स्थ ॥
कां झाला इतके तटस्थ ॥
उपकारबुद्धि सर्व हृदयस्थ ॥
आहे जाणा निश्चयें ॥ २१ ॥
प्रथम मनोदेवता सांगे तयास ।
कीं शत्रूस चावून फाडायास ॥
मग तिणेंच सांगितलें तयास ॥
रक्षावया मित्रातें ॥ २२ ॥

---

१ रोमनशहरांत राहाणारे.

## कोडें. २७

### श्लोक.

सूची लहान किति ही असली तरीती॥
माझ्याहुनी बरीच जाड खरोखरी ती॥
तीचा जना मजहुनी उपयोग भारी॥
या साठीं मोल मजला कमतीच भारी॥१॥

### आर्या.

जितकी वासर[1] संख्या, भरते एक्यात वत्सरा[2]मध्यें॥
तितकी अमुची संख्या, मिळते पैशांत आपणा[3]मध्यें॥२॥
उपयोग फार नसुनी, जरि आहे मोल आमुचें स्वल्प॥
तरि उत्पन्न कराया, श्रम आम्हां पुरत नाहीं बा अल्प[4]॥ ॥३॥
[illegible]ानें शेवट, पावेतों बा तयार करण्यास॥
कारागीर हि थोडे, लागत नाहींत दक्ष[5] आम्हांस॥४॥

---

१ दिवस संख्या. २ वर्षांत. ३ बाजारांत. ४ थोडा. ५ निपुण

किलुकतो धातूला, अग्नीवर ठेउनीच एकजण ॥
दुसरा तार रसाची, करितो देता न जाऊं एकक्षण ॥५॥
तिसरा तुकडे करितो, कातर घेऊनि हातीं तारीचे ॥
चवथा तयांस करितो, घांसुनि घांसुनि समान लांबीचे ॥६॥
या सर्वांच्या वरनी, बसवाय साठीं पांचवा करितो ॥
डोकीं सुरेख वर्तुळ, आणि सहावा तयांस तीं जडतो ॥७॥
कानस आणि हातोडा, हातीं घेऊनि सातवा करितो ।
टोकें नीट तयांचीं, आणि समाप्तीस काम पाववितो ॥८॥
इतक्या आयासानें होतो जो या पदार्थ निष्पन्न[1] ॥
सांगेल कोण त्याचें, नाम मला पुरुष बुद्धिसंपन्न[2] ॥९॥
हें कोडें माझें तूं, जर बुद्धि खर्चुनी उकलशील ॥
तरी तूं निश्चित अपुल्या, आयासा त्तव मलाच घेशील ॥१०॥

१ उत्पन्न. २ बुद्धिमान.

# रेशमी किडा. २८

## आर्या.

एप्रिल महिना आहे, तंववारिक रेशमी किडा निघतो ।
सर्व हिंवाळ्या भरतो, सौख्यानें आपुल्या गृहीं असतो । ॥१॥
या सर्व ऋतूं मध्यें, त्याला भक्षण करावया मिळतें ॥
पान तुतिचें ज्याला, खावें तितकें पुरून ही उरतें ॥२॥
कारण वाढ तयाची, पूर्णावस्थेस एकदां आली ॥
म्हणजे तो खातांना, कोणाला दिसत नाहिं त्याकाळीं ॥३॥
जैसा तो खातांना, लोकांच्या पडत नाहिं दृष्टीला ॥
तैसाचि उपोषित ही, त्याकाळीं दिसत नाहिं सृष्टीला[1] ॥४॥
त्याचि अवस्थेमध्यें, धंदा आरंभितोचि तो अपुला ॥
तंतूंस विणुन कांतुन, वेष्टुन घेतोच तो आपुल्या वपुला[2] ॥५॥

---

१ पृथ्वींतील लोकांला. २ शरीराला.

आणिक हवींतशी तो, एकावर एक वर्तुळें रचुन ॥
अपुल्या भोंतीं करितो, कोशा[1] मजेचा सुरेख बा विणुन ॥ ६ ॥
जरि कोशा तलम[2] भारी, असतो तरि सूक्ष्मदृष्टिच्यालाही[3] ॥
त्यांतुनि दिसत नाहीं, अंतर्गत वस्तु त्यांतली कांहीं ॥ ७ ॥
ऐशापरि अपणाला, घेतो तो कीट वेष्टुनी जेव्हां ॥
समजावेंचि तयाचें, काम समाप्तीस पावलें तेव्हां ॥ ८ ॥
जरि तो कीटक असतो, जेव्हां तो दिसत नाहिंसा होतो ॥
तरि पडतां बाहेरी, सुंदर पक्षी दिसून येतो तो ॥ ९ ॥
मग तो अंडीं घालुन, कीटांची पुरवणी बहू करितो ॥
पुढल्या वर्षा करितां, नंतर जाऊन शेवटीं मरतो ॥ १० ॥
जर ह्या भूगोलावर, ह्या कीटासारिखे इतर असते ॥
कीटक उपयोगाला, लोकांच्या फार या जगीं पडते ॥ ११ ॥

---

१ घर. २ बारीक. ३ बारीक पाहाणाऱ्याला.

# निरुपद्रविक चोर. २९

## श्लोक.

ल्हान थोर दिसती कुसुमें[1] विचित्र[2] ॥
रानीं तरीं उपवनीं[3] परि पाहि चित्र[4] ॥
यांतील एकही नसेचि न दे रसास[5] ॥
उद्योगि[6] शालिनि अशा मधुमक्षिकेस
॥ १ ॥

## आर्या.

जरि चौर्य कर्म करुनि, सर्व फुलांतिल रसास ती हरिते ॥
तरि युक्तिनेंच अपुल्या, कर्माची खूण नाहिंशी करिते ॥ २ ॥
इतक्या चतुराईनें, पुष्पांतील रस हरून ती घेते ॥
कीं त्यांच्या गंधश्री, पावत नाहींत कांहिं उणिवेतें ॥ ३ ॥

---

१ फुलें. २ अनेक रंगाचीं. ३ बागेंत. ४ आश्चर्य. ५ मधुरस. ६ मेहनत करणाऱ्या.

### श्लोक.

दिसति अन्य किडे कुसुमांतरीं ॥
अरि मला गमतातचि ने तरीं ॥
बहुतकाळ तयांतचि राहुनी ॥
करिति नाश तदंगचि खाउनी ॥४॥

### आर्या.

ऐसे शुक काकादिक, पक्षी आहेत शत्रु कुसुमांस ॥
ते त्यांचा प्राण हरुनि, आनंदें भक्षितात तन्मांस ॥५॥

### श्लोक.

ऐशापरी कुसुमनाश विनाशकारी ॥
आहेत पक्षि आणि कीटक शत्रु भारी ॥
चोरूनि मात्रि जरि तो मकरंद नेते ॥
सर्वांशि मेण आणि गोड मधाशि देते ॥६॥

---

१ शत्रु. २ यांचा. ३ त्यांचें अंग. ४ फुलांचा नाश. ५ पुष्परस.

## आर्या.

मोठा रसायनज्ञहि, जरि बा घेईल फार आयास ॥
तरि न शकेचि कधींही, पदार्थ उत्पन्न हा करायास॥७॥
व्हावें तितकें तिजला, चोरूं देबा तिचेंच मध्वन्न ॥
जरि हें न घडेल जगीं, तरि मधु होणार नाहिं उत्पन्न॥८॥

---

## गोगलगाय. ३०

## आर्या.

गोगलगाय चिकटुनी, असते फक्तभिंत पर्ण तृण ह्यांस॥
जणु स्वगृहासह तेथें, बादलि म्हणुनी न भी पडायास॥१॥
बादळ आणिक दुसरी, ज्यावेळी भीति येउनी पडते ॥
त्यावेळीं ती अपुल्या, गेहामध्येंच झडकरी शिरते॥२॥

---

१ रसमिश्रण विद्या जाणणारा. २ श्रम. ३ मध. ४ मधुरूप अन्न.
५ आपुल्या घरास. ६ भय.

स्पर्श तिच्या श्रृंगाला[१], केला कोणीहि अल्पे जरीं ॥

संकोचुनि देहातें, घे ते ती आपुल्या स्थलांच तरीं ॥३॥

जेथें तिचें रहाणें, तेथें वसते सदैव एकलिच ॥

तिचें चीजवस्तु आणिक, जडिबुद्धी[६] काय ती तिची तीच ॥४॥

आयुष्य असें अपुलें, वानप्रस्था[८]समान घालविते ॥

भोजन नको दुज्यासह, दुसरा येतांचि शीघ्र संपविते ॥५॥

ती आणि गृहतीचें यांचा वा एक जीव जणु नही ॥

जो शोधितोचि तिजला, जाणावा अंध आंधळ्याहुनही ॥६॥

मोठ्या आयासानें[१०], सांपडलें गेहही जरी तीचें ॥

तरि होत नाहिं दर्शन, वा त्या गेहांत ही गृहपतीचें[११] ॥७॥

---

१ शिंगाला. २ थोडा. ३ आवरून. ४ शरीरानें. ५ राहणें.
६ जिंदगी. ७ वनांतराहण्याच्यासारखें. ८ लवकर. ९ घर. १० श्रमानें.
११ घरधनीणीचें.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ४ | नाहीं | नाहिं |
| २ | ८ | कधिं | कधीं |
| ४ | ८ | जरि | तरि |
| १३ | ८ | सुवर्ण | स्वपर्ण |
| २६ | १ | हाध्वनि | हाबा ध्वनि |
| २६ | ८ | केला | मारिला |
| २८ | २ | प्रकाशाला | प्रकाराला |
| २९ | ६ | प्रेतासन | प्रेतासम |
| ३१ | ३ | पावूनियां | पावूनि या |
| ३४ | १० | पाहिली | पहिली |
| ३६ | १ | वाजऊं | वाजवूं |
| ४१ | १ | लागलों | लागला |

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४० | ८ | तलवारिला | तलवारीला |
| ४१ | १२ | दृष्टि | दृष्टीं |
| ४३ | ५ | जातींमध्यें | जातीमध्यें. |
| ४३ | ११ | बांधियेलें | बांधिलें. |
| ४७ | १ | तीं | ती |
| ४७ | ३ | पाठीं | पाठी |
| ५० | ५ | वाचितांतीं | वाचिताती |
| ५४ | २ | दंवावर | दवावर |
| ५४ | ९ | त्यांचा | त्याचा |
| ५९ | १ | होऊनि | होउनि |
| ६२ | ४ | गति | गती |
| ६६ | १० | काळोक | कालोक |

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६९ | ४ | पाण्याचा | पाण्याच्या |
| ६९ | ८ | घाटेचे | घांटेचे |
| ६९ | १३ | अशिर्वाद | आशीर्वाद |
| ७१ | ११ | स्काटलंडाचा | स्काट्लंडाचा |
| ७२ | १ | सगळां | सगळा |
| ७२ | ३ | रोरावंत | रोरावत |
| ७२ | ४ | ऐक | एक |
| ७४ | ३ | म्हणूनी | म्हणुनी |
| ७८ | ११ | होतो | होता |
| ८३ | १० | बैसो | बैसे |
| ८३ | ४ | परिसावो | परिसावें |
| ८९ | १० | भयग्रन्थ | भयग्रस्त |

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १० | ६ | पूसून | पुसून |
| ११ | २ | आंद्रोक्लीस | आंद्रोक्लीज |
| १५ | २ | बरीच | बरिच |
| १५ | ४ | साठीं | साठिं |
| १६ | १ | वितुळतो | वितुळवितो |
| १६ | ३ | हातीं | हातिं |
| १६ | ५ | साठी | साठिं |
| १६ | ७ | हातोडा | हतोडा |
| १७ | ४ | तुतिचें | तुतीचें |
| १७ | १० | ता आपुल्या | आपुल्या |
| १९ | ५ | करूनि | करुनी |
| १०२ | १ | अल्प | हळूच अल्प |
| १०२ | ७ | आणि | आणी |